पोलीस हवालदार संवर्गाची दिनांक १ जानेवारी २००६ पासून सुधारित वेतननिश्चिती करुन त्याप्रमाणे त्यांना देय थकबाकी देण्याच्या कार्यपद्धतीबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : पोलीस १८१४/(प्र.क्र.१५३/२०१४)/पोल ५-अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०२ जानेवारी, २०१९

गृह विभागाच्या अधिपत्याखालील पोलीस हवालदार हा संवर्ग पोलीस नाईक या संवर्गाचे पदोन्नतीचे पद असल्यामुळे त्या संवर्गास शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ सोबतच्या प्रपत्रातील अ.क्र. ९ येथील शिफारशींच्या अनुषंगाने पदोन्नतीच्या आणि निम्न पदाच्या वेतनसंरचेमध्ये फरक ठेवण्यासाठी पदोन्नतीच्या पदास म्हणजेच पोलीस हवालदार या संवर्गास वित्त विभाग, शासन अधिसूचना, दिनांक १९ मे, २०१७ अन्वये रु.१००/- अतिरिक्त ग्रेड वेतन मंजूर करण्यात आले आहे. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांक : वेपूर-१२०९/प्र.क्र. २७/सेवा-९, दिनांक २२ एप्रिल, २००९ प्रमाणे पोलीस हवालदार या संवर्गातील कर्मचाऱ्यांची वेतननिश्चिती दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी करुन, त्यानुषंगाने त्यांना रोखीने थकबाकी दयावी किंवा कसे याबाबत गृह विभाग, पत्र क्रमांक पोलीस १८१४/प्र.क्र. १५३/पोल-५अ, दिनांक २९ सप्टेंबर,२०१७ अन्वये कार्यवाही करण्याबाबत कळविण्यात आलेले आहे. तथापि, याबाबत क्षेत्रिय कार्यालयांकडून वारंवार विचारणा होत असल्याने, तसेच अधिदान व लेखा कार्यालयाचे आक्षेप असल्याने याबाबत पुन:श्च खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**<u>शासन परिपत्रक</u> :-**

शासकीय कर्मचाऱ्यांना दिनांक १ एप्रिल, २००९ पासून सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनसंरचना मंजूर करण्यात आली आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ मधील नियम १५ अन्वये दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक ३१ मार्च, २००९ या कालावधीत शासकीय

कर्मचारी वेतनाची थकबाकी मिळण्यास पात्र असल्यास, सदर रक्कम पुढील पाच वर्षात समान हप्त्यात निर्वाह निधीमध्ये जमा करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.

तथापि, पोलीस हवालदार या संवर्गास वित्त विभाग, शासन अधिसूचना, दिनांक १९ मे, २०१७ अन्वये रु.१००/- अतिरिक्त ग्रेड वेतन मंजूर करण्यात आले असल्याने, दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक ३१ मार्च, २००९ या कालावधीतील थकबाकीची रक्कम पाच वर्षात समान हप्त्यात भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करणे सद्यस्थितीत व्यवहार्य ठरणार नाही. यास्तव संबंधित कर्मचाऱ्यांची दिनांक १ जानेवारी, २००६ पासून उपरोक्त आदेशान्वये मंजूर केलेल्या सुधारित वेतनसंरचनेत वेतननिश्चिती करण्यात यावी व दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक ३१ मार्च, २००९ या कालावधीतील अनुज्ञेय थकबाकी एकरकमी भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी तसेच वित्त विभाग, शासन अधिसूचना, दिनांक १९ मे, २०१७ अन्वये वेतनाचे प्रत्यक्ष लाभ दिनांक १ एप्रिल, २००९ पासून देण्यात यावे.

सदर परिपत्रक वित्त, विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२७/२०१८/सेवा-९, दिनांक ४ ऑक्टोबर, २०१८ नुसार दिलेल्या निदेशास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९०१०२१६१५२८४३२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2019.01.02 16:20:39 +05'30'

**( व्यं.मा.भट )**
उप सचिव, गृह विभाग
महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई

४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर

६) अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई,

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९) सर्व पोलीस आयुक्त

१०) सर्व पोलीस अधीक्षक

११) निवड नस्ती/कार्यासन पोल ५अ, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.